श्री गणरायाचे वसतीस्थान अर्थात “श्री गणेश स्वानंदलोक”

गणेशोत्सवात वेगवेगळया राजवाडे, महाल किंवा मंदिरांच्या प्रतिकृती करण्याची श्रीमंत दगडूशेठ हलवाई गणपती ट्रस्टची परंपरा आहे. यंदाच्या गणेशोत्सवासाठी ट्रस्टने आगळी वेगळी प्रतिकृती तयार करून भाविकांना आश्चर्याचा धक्का देऊ केलेला आहे.आपल्या पुराणात किंवा धार्मिक गोष्टींमध्ये देवांच्या वसतीस्थानांचा उल्लेख नेहमी येत असतो. त्यामुळेच आपल्याला भगवान विष्णूंचे वसतीस्थान म्हणजे विष्णू लोक किंवा वैकुंठ, महादेवांचे वस्तीस्थान म्हणजे शिवलोक किंवा कैलास, ब्रह्मदेवांचा ब्रह्मलोक, इंद्रादी देवांचा स्वर्गलोक, सूर्या व ग्रहांचे सूर्यलोक, देवींचे वस्तीस्थान हे शक्तीलोक म्हणून ओळखले जाते तसेच आपल्या गणपतीचे वसतीस्थान आहे का ? असेल तर ते कोणते? या प्रश्नाचे उत्तर आपल्याला कुठेही सापडलेले नाही.

गणपती ही महादेव –पार्वतीचा मुलगा असल्याने सहाजिकच त्याचे वस्तीस्थान हे कैलासच असेच आपण मानतो. पण गणपती हा गणांचा अधिपती आहे त्यामुळे त्याचे स्वतंत्र वस्तीस्थान असून त्याला स्वानंद लोक म्हणून ते ओळखले जाते.
मोरगाव हे अष्टविनायकातील पहिले गणपतीचे स्थान आहे. या मोरगावाच्या अनेक कथा आहेत. या मोरगावाला भूतलावावरील स्वानंदलोकाचा दर्जा सर्व देवदेवतांनीच दिलेला आहे.

कशी आहेत यंदाची सजावट ?
आपण पृथ्वीवर म्हणजे भूतालावावर रहातो त्यामुळेच तिथेच गणपतीसह सर्वच देवांची उपासना,
आराधना करतो. तसाच गणेशाचा उत्सव मंडप म्हणजे पृथ्वी आहे. तेथे पुण्यकर्म केल्याने आपल्याला स्वर्ग प्राप्ती होते असे सांगण्यात येते. त्यामुळे पहिल्या मजल्यावर इंद्रादी देवांचा स्वर्गलोक आहे. तेथे राहून पुण्य कमावाले की ब्रह्मलोक प्राप्त होतो. त्यानंतर महालक्ष्मी, महाकाली महासरस्वती अशा तीन
देवींचा शक्तीलोकाची प्राप्ती होते. त्यानंतर सूर्यलोकाची प्राप्ती होते. सूर्यलोकांमध्ये केलेल्या चांगल्या कर्माचे फळ म्हणजे श्री विष्णूंच्या विष्णूलोकात म्हणजेच वैकुंठात प्रवेश मिळणे. विष्णूलोकातील सत्कर्म आपल्याला म्हणजेच मानवाला शिवलोकात म्हणजेच कैलासावर घेऊन जातात. कैलासावरील
वास्तव्यात करताना काम, क्रोध, लोभ, मद, मोह, मत्सर, मय आणि अहंकार अशा अष्टरिपूंवर आपण विजय मिळवला की अष्टविनायक आपल्याला श्री गणरायाच्या चरणी म्हणजेच स्वानंद लोकात घेऊन जातात. म्हणजेच ख-या अर्थाने मानवी जीवाला मोक्ष प्राप्ती होते. यात प्रत्येक मजल्यावरील
देवतेचे वस्तीस्थान प्रतिकात्मक स्वरूपात दाखवलेले आहे. स्वर्गलोकात इंद्रादेव आहेत, ब्रह्मलोकात ब्रह्मा आहेत तर तीन देवता, त्यावर सूर्यमालिका, विष्णूलोकात श्री विष्णू शेषषाही भगवान स्वरूपात समुदात आहेत तर बर्फाच्छादित कैलासावर महादेव आहेत. काम, क्रोध, लोभ, मद, मोह, मत्सर, मय आणि अहंकार हे अष्ट रिपू म्हणजे असूर म्हणजेच राक्षस असून त्यांच्यावर विजय मिळवण्यासाठीच श्री गणरायांनी अनुक्रमे श्री विकट गणेश, श्री लंबोदर गणेश, श्री गजानन गणेश, श्री एकदंत गणेश, श्री महोदर

(साक्षी गणेश), श्री वक्रतुंड गणेश, श्री विघ्नराज गणेश आणि श्री धूम्रवर्ण गणेश अशी आठ अष्टविनायकची रूप घेतली. ते भ्रमारी शक्ती म्हणून आपले प्रचलित अष्टविनायक दाखवले असून त्यावर श्री गणेश स्वानंद लोक आहे. भूतलावावरील स्वानंद लोक म्हणजे मोरगाव असल्याने या स्वानंद लोकाच्यावर कळस मोरगावच्या मंदिराचा आहे. भूलोकावरी गणेश मंडपाच्या पूर्व व्दावाला धर्म मंडपअशून त्यात मांजारी शक्ती व श्री विष्णूलक्ष्मी आहेत. दक्षिण व्दाराला अर्थ मंडपात विरजा शक्ती असून तेथे महादेव-पार्वती आहेत. पश्चिमेला असलेल्या श्री काम मंडपात सिंहासनारूढ आदीशक्ती जगदंबा आहे आणि उत्तर व्दारावरील मोक्ष मंडपात सूर्यनारायण आहेत. तसेच मुख्यमंडपाच्या प्रवेश व्दारावर मोद –प्रमोद व्दारपालच्या रूपात आहेत. तसेच तेथे गणपतीचे उपासक असलेल्या गणपत्य ऋषींची छायाचित्रेही दारावर लावण्यात येणार आहेत. या संपूर्ण सजावटीसाठी गणपत्य श्री. स्वानंद पुंड  आणि मोरगावच्या स्वामींचे मार्गदर्शन लाभले आहे.

देखाव्याची जमिनिपासूनची उंची 90 फूट आहे. एकूण सात मजली सजावट असून सर्वात वर मोठा एक व दोन्ही बाजूला दोन लहान कळत आहेत. या शिवाय अनेक छोटे छोटे कळत यावर आहेत. रंगीबेरंगी दिवे याला बसवण्यात आलेअसून अनेक रंगांमध्ये ही देवांची वस्तीस्थाने उजळून निघणार आहेत.